सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या बाबीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत.... (कार्यक्रम खर्च).

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मफुवि-१४२३/प्र.क्र.२३३/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१/०३/२०२४.

**वाचा :** १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मफुवि-३७२३/प्र.क्र.११२/७अे, दि.३१.५.२०२३ व दि.११.०८.२०२३.
३)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मफुवि-१४२३/प्र.क्र.११८/७अे, दि.२०.१०.२०२३.
४)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मफुवि-१४२३/प्र.क्र.९३/७अे, दि.५.१.२०२४.
५) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/नियंत्रक/ ३७९९/२०२३, दि.२७.१०.२०२३.
६)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मफुवि-१४२१/प्र.क्र.२३३/७अे, दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठास मागणी क्र.डी-३, ०१,पीकसंवर्धन,१२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००७२) या लेखाशीर्षातंर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या बाबीकरीता एकूण रु.३०००.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार अर्थसंकल्पीय तरतूदीच्या १०० टक्के प्रमाणे एकूण रु.३०००.०० लाख निधी टप्प्या-टप्प्याने संदर्भ क्र.२ व ४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांनी राहुरी कृषि विद्यापीठांतर्गत चालू असलेल्या विविध महाविद्यालयांच्या बांधकामांकरीता लेखाशिर्ष (२४१५ ००७२) अंतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या उद्दीष्टाखाली पूरवणी मागणी प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यासअनुसरुन विधानमंडळाच्या माहे जुलै,२०२३ च्या पावसाळी अधिवेशनात, वित्त विभागाने महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता.मालेगाव,जि.नाशिक येथील कृषि विज्ञान संकुलातील इमारतींच्या बांधकामासाठी राहुरी कृषि विद्यापीठाच्या (२४१५ ००७२) या लेखाशिर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाखाली रु.५०००.०० लाख (अक्षरी रु.पन्नास कोटी) इतक्या अतिरिक्त निधीची पुरवणी मागणी मंजूर केली होती. सदर पुरवणीमागणीद्वारे अर्थसंकल्पीत झालेला रु.५०००.०० लाख निधी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

त्याचप्रमाणे नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या पुरवणी मागणी प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने विधानमंडळाच्या सन २०२३ च्या तिसऱ्या (हिवाळी) अधिवेशनात महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता.मालेगाव, जि.नाशिक येथील कृषि विज्ञान संकुलातील महाविद्यालयांच्या इमारतींच्या बांधकामासाठी (२४१५ ००७२) या लेखाशिर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाखाली रु.५०००.०० लाख इतक्या अतिरिक्त निधीची पुरवणी मागणी मंजूर केली आहे. सदर पुरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या निधीमधून महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या कृषि विद्यापीठास संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये रु.२५००.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु.५०००.०० लाख निधीपैकी उर्वरित रु.२५००.०० लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता,महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, या लेखाशीर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता मंजूर एकूण अर्थसंकल्पीय तरतुदीतून व सुधारित अंदाजाच्या मर्यादेत खालीलप्रमाणे रु.२५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | योजना/योजनेंतर्गत येणारे महाविद्यालय | प्रशासकीय मान्यता किंमत (अनावर्ती) | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मूळ अर्थसंकल्पीत तरतूद | पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत तरतूद | एकूण अर्थ-संकल्पीत तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ००७२, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | महात्मा फुले कृषि विद्यापीठ राहुरी, अंतर्गत कृषि विज्ञान संकुल,मौजे काष्टी, ता.मालेगाव, जि.नाशिक | फेज १- १६९२४.०० फेज २ - २१८२५.०० | ३०००.०० | १००००.०० | १३०००.०० | २५००.०० |
| | **एकूण -** | | | **३०००.००** | **१००००.००** | **१३०००.००** | **२५००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२२, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/ योजनांसाठी/ बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधीत कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**४.** सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५.** सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६६/का.१४३१, दि.०५.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०६/२०२४/व्यय-१, दि.०७.०३.२०२४ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२११३००५४९५०१ असा आहे, हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.21 13:11:31 +05'30'

**( मिताली चौधरी )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.

५. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/ उपकोषागार अधिकारी,राहुरी,जिल्हा अहमदनगर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.कक्ष अधिकारी, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.